सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील संचालक, आरोग्य सेवा (शहरी)-०१ पद, उपसंचालक, आरोग्य सेवा (शहरी) -०२ पदे, सहायक संचालक, आरोग्य सेवा (शहरी)-०४ पदे या अस्थाई पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः- अपदे-२०२५/प्र.क्र.६२/ आरोग्य-३
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
दिनांकः- ०४ मार्च, २०२५.

वाचा:-

१) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः- पदनि-२०२०/प्र.क्र.१४३/आरोग्य-३, दिनांक-१५.०९.२०२०.
२) आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई, यांचे पत्र क्रमांकः- आसेआ/ आस्था/कक्ष-१/टे-२/संचालक (शहरी)/३१६/२५, दि. २४.०२.२०२५.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क, दि.०६.०९.२०२४.

शासन निर्णयः-

राज्यातील शहरी भागातील नागरीकांसाठी लसीकरण, साथरोग नियंत्रण तसेच त्यावरील प्रतिबंधात्मक उपाययोजना इ. आरोग्य विषयक कार्यक्रम अधिक परिणामकारकतेने राबविण्यासाठी तसेच आरोग्य विभाग व स्थानिक स्वराज्य संस्था यांच्यामध्ये समन्वय साधून त्यांना अशा कार्यक्रमांच्या अंमलबजावणीबाबत सर्व प्रकारचे तांत्रीक मार्गदर्शन करण्यासाठी राज्यातील शहरी भागासाठी संचालक, आरोग्य सेवा (शहरी)-०१ पद, उपसंचालक, आरोग्य सेवा (शहरी) -०२ पदे, सहायक संचालक, आरोग्य सेवा (शहरी)-०४ पदे अशा एकुण ०७ पदांची निर्मिती करण्यास उपरोक्त शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

२. आता या शासन निर्णयान्वये संचालक, आरोग्य सेवा (शहरी)-०१ पद, उपसंचालक, आरोग्य सेवा (शहरी) -०२ पदे, सहायक संचालक, आरोग्य सेवा (शहरी)-०४ पदे अशा एकुण ०७ अस्थायी पदांना पूर्वलक्षी प्रभावाने दि.०१.०९.२०२४ ते दि. २८.०२.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०२४-२०२५ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक-आर-१**

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
०१ - नागरी आरोग्य सेवा-विषम चिकित्सा,
००१ - संचालन व प्रशासन,
(०१) - आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई (अनिवार्य) (२२१० ००९३)
(०१) - वेतन

४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक, पदनि-२०१६ /प्र.क्र.८ /१६ / आ.पु.क, दि. ०६.०९.२०२४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक, पदनि-२०१६ /प्र.क्र.८ /१६ /आ.पु.क, दि. ०६.०९.२०२४ अन्वये दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत अस्थाई पदांच्या मुदतवाढीस मान्यता देण्यात आली असली तरी, दरम्यानच्या काळात सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याबाबत सर्व प्रशासकीय विभागांनी तातडीने प्रस्ताव सादर करण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे. तसेच उपरोक्त संदर्भ क्र.०३ अन्वये वित्त विभागाच्या शासन निर्णयानुसार, अस्थायी पदांना दि.२८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली असून त्यादरम्यान सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याकरीता सुधारीत आकृतीबंधाचे प्रस्ताव शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २९ जून,२०१७ नुसार तपासून व त्यानुसार कार्यवाही करुन तातडीने वित्त विभागास सादर करण्याकरीता आयुक्तालय कार्यालयाने उचित कार्यवाही करावी व त्याबाबातचा प्रस्ताव शासनास पाठवावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०४१६११४९९३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY DATTARAM MAHADESHWAR

Digitally signed by SANJAY DATTARAM MAHADESHWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=759d43d3ca03f08520a6d49169531e74206cd390898bbe0690fead8f00f6a3eb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=09A8917EDE715503310B61D8A24357A945B188F3A254ABA25AC8365BB66E4EE8, cn=SANJAY DATTARAM MAHADESHWAR
Date: 2025.03.04 16:13:49 +05'30'

**( सं. द. महाडेश्वर )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्यसेवा, मुंबई.

४. सहसंचालक, आरोग्य सेवा(रुग्णालये- राज्यस्तर) मुंबई.

५. सहसंचालक, आरोग्य सेवा(अर्थ व प्रशासन) मुंबई.

६. उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ.

७. जिल्हा आरोग्य अधिकारी, गडचिरोली/गोंदिया.

८. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली/गोंदिया.

९. वित्त विभाग,(व्यय-१३) मंत्रालय,मुंबई.

१०. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प,सा.आ.वि.मंत्रालय,मुंबई.

११. निवडनस्ती (आरोग्य-३)